होण्यापूर्वीच्या सुरुवातीस हिंदुस्तानाप्रमाणें आफ्रिकेंतहि हिमनद्या कांही ठिकाणीं असल्या पाहिजेत, अशा तऱ्हेचा पुष्कळ पुरावा आहे. हिंदुस्थानात गोंडवणी कालानंतर ज्वालामुखींचे मोठ्या प्रमाणावर स्फोट होऊन काळवथरी ( ट्रॅप ) खडक झाला, त्याप्रमाणें आफ्रिकेंतहि कारू कालानंतर ज्वालामुखींचे स्फोट होऊन अग्निजन्य खडक बरेच बनले आहेत. कारु खडकाचा प्रदेशहि मोठा आहे. पूर्वेच्या बाजूस समुद्रकिनाऱ्यापर्यंत, पश्चिमेस क्रिस्टल पर्वतापर्यंत, दक्षिणेस केप कालनीपर्यंत व उत्तरेस सहाराच्या मध्यभागापर्यंत कारू खडकाचा विस्तार आहे.

यानंतरच्या कालात गोंडवणी जमिनीचीं शकलें झालीं. हिंदुस्थान आफ्रिकेपासून अलग झाला. हल्लीं हिंदी महासागरात व आफ्रिकेशेजारीं जीं बेटें आहेत तीं त्या जमिनीचीं शकलें आहेत.

ज्युरीन कालात पूर्व आफ्रिकेत मोझांबिकपर्यंत समुद्र येऊन पोहोचला असावा व सितोपल ( क्रेटेसिअस ) कालात समुद्र साहाराच्या मध्यभागापर्यंत गेला असावा. कारण त्या ठिकाणीं सितोपल कालच्या समुद्रात सांपडणाऱ्या प्राण्याच व वनस्पतीचे प्रस्तरीभूत झालेले भाग दृष्टीस पडतात.

आफ्रिकेंत तृतीयावस्थाक ( टर्शरी ) काळातील खडक पूर्व व पश्चिम समुद्रकिनाऱ्यावर कांहीं ठिकाणीं अगदीं थोड्या प्रमाणात आढळतात; परंतु उत्तर आफ्रिकेंत ते बऱ्याच मोठ्या प्रमाणात सांपडतात. या खडकात नम्युलिटिक ( नम्युलाइट नांवाचे प्रस्तरीभूत झालेले लहान प्राणी ज्यांत सापडतात असा ) नांवाचा चुन्याचा खडक सांपडतो, ही एक फार महत्त्वाची गोष्ट आहे. कारण हाच खडक आफ्रिकेंतील इजिप्तपासून आशिया खंडांतील चीन देशापर्यंत आढळतो.

यूरोपांत हिमनद्यांचा जो काल होऊन गेला त्या वेळीं आफ्रिकेच्या उत्तर भागातहि हिमनद्या असल्या पाहिजेत असें तेथें सांपडणाऱ्या वाळूवरून व खडकावरून वाटतें. त्यांचा प्रभाव किलीमांजोरा, केनिया, रुवेंझोराय वगैरे ठिकाणापर्यंत पोहोंचलेला आढळतो.

आफ्रिकेंत वज्रतुंड वगैरे अगदीं मूळचे अग्निजन्य खडक आहेत. त्याशिवाय पूर्व आफ्रिकेच्या पठारावर व पश्चिम आफ्रिकेंत अग्निजन्य खडक आढळतात; परंतु ज्वालामुखींचे स्फोट आफ्रिकेंत कोणत्या कालांत प्रथमतः विशेष प्रमाणांत सुरू झाले हें जरी खात्रीनें सांगतां येत नाहीं, तरी पहिले स्फोट दक्षिण आफ्रिकेंत ज्युरिन काळांत व पूर्व आफ्रिकेंतील सितोपल काळांत झाले असावेत असें वाटतें. त्यानंतर केनिया, मार्वेंझी व त्याचप्रमाणें किवो वगैरे ठिकाणचे अग्निजन्य खडक ज्वालामुखी वगैरेंच्या स्फोटामुळें झाले उत्तर आफ्रिकेंत अगदीं नवप्रभात कालापासून तृतीयावस्थाक काळाच्या शेवटपर्यंत स्फोट होत असले पाहिजेत असें दिसतें.

आफ्रिकेंतील निरनिराळ्या लोकांच्या जाती, त्यांची उत्पत्ति व त्यांची संस्कृति यासंबंधीं व आफ्रिकेंतील व्यापारोपयोगी वस्तु व तेथील व्यापार या संबंधी विवेचन पूर्वी ( विभाग चौथा पृ. ४५२-५५ ) येऊन गेलेंच आहे.

**रोमन आफ्रिका.**—ज्या भागाला ग्रीक लोक लिबया म्हणत होते त्याला रोमन लोकांनीं आफ्रिका हें नाव दिलें होतें. रोमन परिचित आफ्रिकेंत इजिप्त व इथिओपिया हे प्रांत खेरीज करून त्यावेळेस माहीत असलेल्या सर्व भागाचा समावेश होत होता. ईनिअस या कवीनें कार्थेज व ॲटलासच्या पूर्वेकडील प्रदेशास आफ्रिका हें नाव दिलें होतें. आफ्रिका या शब्दाची व्युत्पत्ति निराळी आढळते "एशियाटिक फिनिशिआ" यापासून हा भाग विभक्त केला आहे. म्हणून याचें नाव 'आफ्रिका' असें पडलें असें कांहींचे मत आहे. फॅरिकिया (म्हणजे फळें पिकणारा प्रदेश) यावरून आफ्रिका हें नाव पडलें असें कांहीं म्हणतात; इतरांचे असें मत आहे कीं "आरिघा" हे बर्बर लोक पूर्वी या भागात रहात होते व त्यामुळे या प्रांताचें नाव आफ्रिका असें पडलें. हे बर्बर लोक पूर्वी या भागात होते असा रोमन व कार्थेजिअन लोकांचाहि समज होता. रोमन आफ्रिकेमध्ये सिरेनैका व मॉरेटानिया हे प्रांत समाविष्ट नव्हते तिसऱ्या प्युनिक युद्धाच्या वेळेस कार्थेजिअन लोकांची आफ्रिकेची सरहद्द टस्का नदीच्या मुखापासून ग्रेटसाऱ्या आखातावरील टिना या शहरपर्यंत होती. आफ्रिकेच्या इतर भागावर न्युमिडिया किंवा बर्बर या लोकांच्या राजांचें स्वामित्व होतें.

ख्रि. पू. १४६ व्या वर्षी सिपिओनें कार्थेज घेतल्यावर हा सर्व प्रांत रोमन लोकांचा झाला व आपली सरहद्द ठरविण्याकरिता रोमन लोकांनीं उत्तरेस टाबार्कापासून दक्षिणेस टीनापर्यंत मोठा खंदक खणून त्यावर लहानसा तट उभारला होता. या तटाचे कांहीं अवशेष १९०७ सालीं आढळले. तिसऱ्या प्युनिक युद्धात युटिका हाडरमेपेटम, थेप्सस, लेपिस, मिनॅर, आचुल्ला, उझालिस, थियुडॉलिस हीं शहरें कार्थेजच्या विरुद्ध असलेल्या रोमनलोकांनीं लुटलीं व त्यामुळें त्यांची फार लौकर भरभराट झाली.

ख्रि.पू. १०६ या वर्षी जुगर्थाइन युद्ध झालें व त्यात रोमन लोकाना लेप्टिसमॅग्ना, ओईआ, सॅब्राट्र इत्यादि शहरें मिळालीं.

ख्रि. पू. ४६या वर्षी थॅप्सस येथे जी लढाई झाली तीमुळें रोमन लोकानां न्युमिडिया हा प्रांत मिळाला व त्याला हे लोक आफ्रिका नोव्हा हें नाव देऊं लागले. ख्रि.पू. २५ यावर्षी रोमन आफ्रिकेंत पश्चिमेस आम्पसागा नदीच्या मुखापासून पूर्वेस ट्रिपोलिटाना व सिरेनैकापर्यंतचा प्रदेश मोडत होता. राजा व सिनेट यांमध्ये आफ्रिकेच्या रोमन साम्राज्याची वाटणी झाली तेव्हा आफ्रिकेचा प्रांत सिनेटच्या अंमलाखालीं आला व तेव्हांपासून आफ्रिकेचा राज्यकारभार एका वरिष्ठ सुभेदारा (प्रोकान्सलकडे) कडे सोंपविला जात असे या प्रोकान्सलच्या हाताखालीं तीन अधिकारी असून तीन भागावर